कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत (गळीतधान्य व तेलताड) करिता अनुसूचित जमाती प्रवर्गाचा सन २०१९-२० करिता ₹८१.९८ लाख निधी वितरीत करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राअसु-१०१९/प्र.क्र.८९/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १४ जानेवारी, २०२०

**संदर्भ:-**

१) केंद्र शासनाचे अभियाना संदर्भात http://agricoop.nic.in/dacdiviion/dacdiviion/NMOOP२०१४.pdf या संकेतस्थळावर उपलब्ध करुन दिलेल्या मार्गदर्शक सूचना
२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१६/प्र.क्र.२४९/कार्यासन-६, दि. ०३/०४/२०१७
३) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३ दि. ०१/०४/२०१९
४) केंद्र शासनाचे पत्र क्र.४-१/२०१९-NFSM(OS &OP)/C.NO.६८१६७, दि.२६/०६/ २०१९
५) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.अेअपी-२०१९/प्र.क्र.४०/४-अे, दि.०८/०७/ २०१९
६) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.Extn.२/NFSM-OS&OP/Exc.Rel/SC cat/F.NO.८/७२५/१९, दि.२२/०८/२०१९
७) केंद्रीय कृषी मंत्रालयाचे पत्र-१४-१/२०१९-CA-II, दि.१७/०९/२०१
८) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.वि.प्र.२/राअसु (गळीत)१९-२०/वि.मा.प.हप्ता/प्र.क्र.०८/२३४३/१९, दि.२५/०९/२०१९
९) आदिवासी विकास विभागाचे शासन परिपत्रक क्र.टिएसपी-२०१९.प्र/क्र.९०/का.६, दि.११/११/२०१९
१०) आदिवासी विकास विभागाचे शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१९/प्र.क्र.७/कार्यासन.६, दि.०८/०१/२०२०

**प्रस्तावना :-**

तेलबियांच्या उत्पादनात वाढ करण्यासाठी केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान [National Mission on Oilseed and Oil Palm (NMOOP)] सन २०१४-१५ पासून राज्यात राबविण्यात येत आहे. सदर अभियानाअंतर्गत लघुअभियान-१ (तेलबिया), लघुअभियान-२ (तेलताड) व लघुअभियान-३ (वृक्षआधारित तेलबिया) या तीन लघुअभियानांचा समावेश आहे.तथापि, सद्यस्थितीत लघुअभियान-१ व लघुअभियान-३ या दोनच अभियानाची अंमलबजावणी करण्यात येत आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने सन २०१९-२० मध्ये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत (गळीतधान्य व तेलताड) अभियान राबविण्यासाठी संदर्भ क्र.४ येथील दि.२६ जून, २०१९ च्या पत्रान्वये रु.५२७२.८६ लाख (केंद्र हिस्सा रु.३१६६.६० लाख व राज्य हिस्सा रु.२१०६.२७ लाख) एवढया रकमेचा वार्षिक कृती आराखडा मंजूर केला आहे. सदर रकमेच्या कार्यक्रमास संदर्भ क्र.५ येथील दि.०८ जुलै, २०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्र.७ येथील दिनांक १७ सप्टेंबर, २०१९ च्या पत्रान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व वृक्षजन्य तेलबिया) अंमलबजावणीसाठी पहिल्या हप्त्याचा तीन्ही प्रवर्गाकरिता एकूण रु.१६४५.५६ लाख निधी मुक्त केला आहे. अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता अभियानांतर्गत पहिल्या हप्त्यापोटी अभियान-१ (तेलबिया) करीता केंद्र हिस्याचा ₹१५२.६२ लाख निधी व अभियान-३ (वृक्षजन्य तेलबिया) करीता रु.२.०६ लाख

असा एकूण रु.१५४.६८ लाख निधीचा अंतर्भाव आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र.५ येथील सन २०१९-२० मध्ये अभियान क्र.१ साठी पहिल्या हप्त्याचा निधी मुक्त करताना अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता रु.११७.९३ लाख व अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता रु.१०५.२५ लाख असा एकूण रु.२२३.१४३ लाख निधी मंजूर कार्यक्रमापेक्षा अतिरिक्त मुक्त केला आहे.

त्यानुषंगाने आयुक्तालयाने अभियानातंर्गत फक्त उपअभियान-१ (गळीतधान्य) व अभियान-३ (वृक्षजन्य तेलबिया) करिता अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र व राज्य हिस्स्याचा निधी वितरणाचा प्रस्ताव पुढीलप्रमाणे प्रस्तावित केला आहे. त्याप्रमाणे अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी मुक्त केलेला केंद्र हिस्स्याचा रु.४९.१८८ लाख निधी त्या समरुप राज्य हिस्याचा ₹३२.७९२ लाख असा एकूण ₹८१.९८ लाख वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णयः**

१. सन २०१९-२० करीता कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत (गळीतधान्य व तेलताड) राज्यात राबविण्यासाठी अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी केंद्र व राज्य हिस्स्याचा मिळून एकूण ₹८१.९८ लाख (रुपये ऐक्याऐंशी लाख अठ्ठयाण्णव हजार फक्त) निधीच्या वितरणास मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीपैकी केंद्र व राज्य हिस्साच्या निधीचे विवरण पुढीलप्रमाणे-

**(रु.लाख)**

| **अ. क्र.** | **उपअभियान** | **अनुसूचित जमाती प्रवर्ग** | | **एकूण** |
|---|---|---|---|---|
| | | **केंद्र हिस्सा (६०%)** | **राज्य हिस्सा (४० %) (डी.पी.सी.तून)** | |
| १ | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान क्र.१ (तेलबिया) | ४७.३७ | ३१.५८ | ७८.९५ |
| २ | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान क्र.३ ( वृक्षजन्य तेलबिया) | १.८१८ | १.२१२ | ३.०३ |
| **एकूण** | | **४९.१८८** | **३२.७९२** | **८१.९८** |

२. परिच्छेद-१ मध्ये नमूद केल्यानुसार **राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत (गळीतधान्य व तेलताड) करिता केंद्र हिश्श्याचा ४९.१८८ लक्ष निधी (अक्षरी रुपये एकोणपन्नास लाख अठरा हजार आठशे फक्त)** आयुक्त (कृषी) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात येत असून सदर निधी खालील लेखाशिर्षातर्गत सन २०१९-२० करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा:-

मागणी क्र. टी-५,
२४०१- पीकसंवर्धन,
७९६- जनजाती क्षेत्रांतर्गत उपयोजना (पंचवार्षिक योजनांतर्गत योजना),
(०१) (२१) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके
(केंद्र हिस्सा ६० टक्के)
(२४०A५५७), ३३, अर्थसहाय्य

३. तसेच, संदर्भाधीन अ.क्र.१० वरील आदिवासी विकास विभागाचे शासन निर्णयाच्या अधीन राहून कृषी उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत (गळीतधान्य व तेलताड) करीता वितरणास मान्यता देण्यात आलेला **राज्य हिस्स्याचा निधी ₹ ३२.७९२ लाख (रुपये बत्तीस लाख एकोणऐंशी हजार दोनशे फक्त)** बाबत जिल्हास्तरावर जिल्हा नियोजन व विकास समितीच्या (DPDC) लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० करिता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

४. आवश्यकतेपेक्षा अर्थसंकल्पीत तरतुदी कमी असणाऱ्या जिल्हामध्ये संदर्भाधीन अ.क्र.२ वर नमूद शासन निर्णयातील मुद्दा क्र.५ वरील तरतुदीनुसार पुनर्विनियोजनाद्वारे आवश्यक तरतुदी उपलब्ध करून घेण्यात याव्यात.

५. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेल्या केंद्र हिस्स्याच्या निधीच्या प्रमाणात आवश्यक राज्य हिस्स्याच्या निधीस जिल्हा नियोजन व विकास समितीच्या (DPDC) अखत्यारीतील तरतूदीस संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून वित्तीय मान्यता देण्यात यावी.

६. सन २०१९-२० मध्ये राज्यात सदर अभियानाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण आधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २ | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

७. कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व वृक्षजन्य तेलबिया) अंतर्गत केंद्र व राज्य हिश्याच्या निधीचा PFMS प्रणालीद्वारे योग्य प्रमाणात विनियोग होणे आवश्यक असल्याने या शासन निर्णयान्वये कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व वृक्षजन्य तेलबिया) करिता उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या केंद्र हिस्स्याच्या **₹४९.१८८** लक्ष रक्कमेचे बि.डी.एस.प्रणालीद्वारे जिल्हा निहाय/ कार्यालय निहाय वितरण करण्याकरिता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना प्राधिकृत करण्यात येत असून बि.डी.एस.प्रणालीद्वारे वितरीत केंद्र व राज्य हिश्याचा विनियोग संपूर्णत सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीद्वारे (PFMS) करण्यात यावा.

८. सदर निधी खर्च करताना संदर्भ क्र.१ येथील अभियानाच्या मार्गदर्शक सूचना व संदर्भ क्र.५ येथील दि.०८/०७/२०१९ च्या शासन निर्णयातील अटी, शर्ती व विहित कार्य पध्दतीचे कटाक्षाने पालन करण्यात यावे.

९. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३ दि. ०१ एप्रिल, २०१९ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११४१७२७४३१३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

ZENDAGE MAHAVEER BALASAHEB

Digitally signed by ZENDAGE MAHAVEER BALASAHEB
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=a9503a5209c984c11d292912b642bdfd32282e4276fb5541f4f92f23cb110d23, postalCode=400032, street=MADAM CAMA ROAD,MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=43d7bb272129cd1382853268481cb2ceee1f236d393acecb71084bc36ffeed02, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ZENDAGE MAHAVEER BALASAHEB
Date: 2020.01.20 11:07:09 +05'30'

**( महावीर झेंडगे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा. मंत्री (कृषि)यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
२.मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
३.मा.विरोधी पक्ष नेता ,विधानसभा ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानपरिषद ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
५.अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६.आयुक्त (कृषी) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
७.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
८.सहसंचालक (नियोजन), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१
९.जिल्हाधिकारी, (सर्व)
१०.विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
११.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१२.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१३.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
१४.सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन,पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
१५.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
१६.महालेखाकार ( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
१७.नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ /कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
१८.वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३, मंत्रालय, मुंबई - ३२
१९.सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग/आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२०.ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. निवडनस्ती (कार्यासन-४अे), कृषी व पदुम विभाग.